केंद्र पुरस्कृत योजना कापूस तंत्रज्ञान अभियान
सन २०११-१२ मध्ये राबविण्यास वित्तीय
मान्यता देण्याबाबत.

-

महाराष्ट्र शासन
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक-कापूस-१६११/प्र.क्र.१५४/४-अे,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०००३२.
दिनांक- १८ ऑक्टोबर २०११

संदर्भ:- १)शासन निर्णय,कृषि व पदुम विभाग क्र. कापूस -१६०९/सीआर-७४/४-अे,
दिनांक ११ जून,२०१०,दि.३० मार्च,२०११ व दि.३१ मार्च,२०११
२) केंद्र शासन, कृषि मंत्रालय यांचे क्र. ६-१/२०११/सीयु-iv , दिनांक २५मे, २०११
३) शासन निर्णय,कृषि व पदुम विभाग क्र. कापूस -१६११/सीआर-१५४/४-अे,
दिनांक २३ जून २०११
४)केंद्र शासन कृषि मंत्रालय यांचे १८-१/२००९/सीए व्ही(पीटी)दि .१२ ऑगस्ट २०११
५) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.नपि/कापूस-अनु/प्र.क्र.५०१/११-१२/विप्र-३/१८९/२०११,
दि.३१ ऑगस्ट,२०११

**प्रस्तावना:-**

कापूस पिकाचे उत्पादन व उत्पादकता वाढविण्याच्या दृष्टीने केंद्र पुरस्कृत सधन कापूस विकास कार्यक्रम सन १९८२-८३ पासून राबविण्यात येत आहे. या योजनेच्या निधीत केंद्र व राज्य हिश्श्याचे प्रमाण ७५: २५ असे आहे. केंद्रीय कृषि मंत्रालयाने संदर्भाधीन दिनांक २५ मे,२०११ च्या पत्रान्वये सन २०११-१२ मध्ये केंद्र पुरस्कृत सधन कापूस विकास कार्यक्रम या योजनेस रु.२६५.०० लाख (रु. दोन कोटी पासष्ट लाख फक्त ) इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान केली असून त्यामध्ये केंद्र व राज्य हिस्सा अनुक्रमे रु. २२५.०० लाख (रु. दोन कोटी पंचवीस लाख फक्त ) व रु.४०.०० (रु. चाळीस लाख फक्त ) इतका आहे. केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार हा कार्यक्रम राज्यात सन २०११-१२ मध्ये राबविण्यास एकूण रु. २६५.०० लाख इतक्या कार्यक्रमास संदर्भाधीन अनु.क्र. ३ येथील शासननिर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.केंद्रशासनाने त्यांच्या संदर्भाधीन अनु.क्र. ४ येथील पत्रान्वये सदर योजनेअंतर्गत सन २०१०-११ मधील रू.१२.४० लाख (रू. बारा लाख चाळीस हजार फक्त ) अखर्चित निधी खर्च करण्यास व सन २०११-१२ करीता रू. २१२.६० लाख (रू. दोन कोटी बारा लाख साठ हजार फक्त) निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता दिली आहे. केंद्र शासनाने दिलेली मान्यता विचारात घेऊन सन २०१०-११ मधील अखर्चित रू.१२.४०लाख (रू. बारा लाख चाळीस हजार फक्त ) निधी सन २०११-१२ मध्ये खर्च करण्यास त्याचप्रमाणे केंद्रशासनाने सन २०११-१२ करीता मुक्त केलेल्या केंद्रहिश्याच्या रू.२१२.६० लाख (दोन कोटी बारा लाख साठ हजार फक्त) निधीच्या कार्यक्रमास तसेच कृषि आयुक्तालयाने संदर्भाधीन अ.क्र.५ येथील पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरून कृषि आयुक्तालय स्तरावर प्रमाणित बियाणे वाटप व आकस्मिक खर्च या बाबींकरीता राज्य हिश्श्याच्या रू. ७.५० लाख (रुपये सात लाख पन्नास हजार फक्त)निधीच्या कार्यक्रमास अशा एकूण रु.२२०.१० लाख (रुपये दोन कोटी वीस लाख दहा हजार फक्त) निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

केंद्रशासनाने त्यांच्या संदर्भाधीन अनु.क्र. ४ येथील पत्रान्वये सदर योजनेअंतर्गत सन २०१०-११ मधील रू.१२.४० लाख (रू. बारा लाख चाळीस हजार फक्त ) अखर्चित निधी खर्च करण्यास दिलेल्या मान्यतेस अनुसरून सदर निधी या वर्षी खर्च करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

केंद्र शासनाने दिलेली मान्यता विचारात घेऊन केंद्रहिश्याच्या रू.२१२.६० लाख (रुपये दोन कोटी बारा लाख साठ हजार फक्त) निधीच्या कार्यक्रमास त्याचप्रमाणे कृषि आयुक्तालयाने संदर्भाधीन अ.क्र.५ येथील पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरून कृषि आयुक्तालय स्तरावर प्रमाणित बियाणे वाटप व आकस्मिक खर्च या बाबींकरीता राज्य हिश्श्याच्या रू. ७.५० लाख (रुपये सात लाख पन्नास हजार फक्त) निधीच्या कार्यक्रमास अशा एकूण रु.२२०.१० लाख (रुपये दोन कोटी वीस लाख दहा हजार फक्त) निधीच्या कार्यक्रमास याद्वारे शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. जिल्हाधिकारी यांच्या अखत्यारीतील जिल्हानिहाय कार्यक्रमास वित्तीय तरतूद संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडून स्वतंत्रपणे वितरीत करण्यात येईल.

३. केंद्र शासनाने त्यांच्या दि.१२.८.२०११ च्या पत्रान्वये योजनेमधील घटकनिहाय निधीचे वाटप खालीलप्रमाणे दिले आहे :-

| अ.क्र. | घटक | मुक्त निधी |
|---|---|---|
| १ | सर्वसाधारण (Gen) | १७१.९९ |
| २ | अनु.जाती (SC) | २१.६९ |
| ३ | अनु.जमाती (ST) | १८.९२ |
| | **एकूण** | **२१२.६०** |

४. या योजनेखाली मंजूर निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०११-१२च्या मंजूर तरतूदीतून भागवण्यात यावा.

मागणी क्र. - डी-३ ( रू. लाखात)

२४०१ पीक संवर्धन, १०८, वाणिज्यिक पिके
केंद्र पुरस्कृत योजना (केंद्र हिस्सा ७५%)
(०१) (०२) कापूस विकास तंत्रज्ञान अभियांन(२४०१ २५४२)
३३ अर्थसहाय्य (२१२.६०)

मागणी क्र. - डी-३
२४०१ पीक संवर्धन, १०८, वाणिज्यिक पिके
(००)(१०८)वाणिज्यिक पिके
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना
राज्य योजनांतर्गत योजना (राज्य हिस्सा २५%)
(०१) कापूस विकास
(०१)(०१)कापूस विकास तंत्रज्ञान अभियांन
दत्तमत (२४०१ ०६७३)
३३ अर्थसहाय्य (७.५०)

५. केंद्र शासनाच्या संदर्भाधीन क्र.२ येथे नमूद केलेल्या दिनांक २७ एप्रिल २०११ च्या पत्रातील केंद्र पुरस्कृत कापूस तंत्रज्ञान अभियान योजनेच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन केंद्र पुरस्कृत कापूस तंत्रज्ञान अभियान सन २०११-१२ मधील काही कार्यक्रम स्वंयसेवी अशासकीय संस्था, कृषि विज्ञान केंद्र, कृषि विद्यापीठे, यांचेमार्फत राबविण्यास शासन मान्यता देत आहे. या संस्थेमार्फत या योजनेतील राबवावयाचे कार्यक्रम आणि संस्थाची निश्चिती करण्याविषयी आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार अशासकीय संस्थाची निवड करण्याचे निकष ठरवावेत आणि त्यानुसार स्वयंसेवी अशासकीय संस्थेमार्फत या योजनेअंतर्गत राबवाववयाचे कार्यक्रम योग्यरित्या राबविण्यात येतील, यासाठी संनियंत्रण करावे.

६. या कार्यक्रमाच्या उद्दिष्ट पूर्तीसाठी आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन उद्दिष्टनिहाय सविस्तर मार्गदर्शक सूचना सर्व क्षेत्रीय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात. या मार्गदर्शक सूचना निर्गमित करतेवेळी पुढील प्रमुख बाबी अंतर्भूत करण्याची दक्षता घेण्यात यावी.

१) लाभार्थी निवडतांना लहान व सिमांतक शेतकरी यांना प्राधान्य देण्यात यावे.

२) मंजूर निधीपैकी कमीत कमी १६% निधी अनुसूचित जाती व ८_% निधी अनुसूचित जमातीसाठी खर्च करण्यात यावा तसेच याबाबतच्या नोंदी स्वतंत्रपणे ठेवण्यात याव्यात.

३) योजनेची अंमलबजावणी अधिक प्रभावी व परिणा्मकारकरित्या होण्याच्या दृष्टीने या योजनेंतर्गत प्रकल्पाधारित विकास /विस्तार कार्यक्रम (**Projectised Development/ Extension Approch**) राबविण्यात यावा.

४) या योजनेचे मुल्यमापन त्रयस्थ यंत्रणेकडून (**Third Party Evaluation** ) करुन घ्यावे

५) वैयक्तिक लाभार्थी निवडतांना प्रथम महिला लाभार्थीना प्राधानय देण्यात यावे. असे लाभार्थी उपलब्ध नसल्यास इतर लाभार्थींची निवड करण्यात यावी.

६) सन २०१०-११ मध्ये लाभ घेतलेल्या व २०११-१२ मध्ये वैयक्तिक लाभ दिलेल्या लाभधारकांची यादी तालुका कार्यालये/ पंचायत समिती/जिल्हाधिकारी कार्यालयात लावण्यात यावी तसेच ती यादी इंटरनेटवर देखील देण्यात यावी.

७. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे या योजनेचा मासिक आर्थिक व भौत्तिक प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याला ५ तारखेपर्यंत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.२०३/११/व्यय १ दि.१५/१०/२०११ अन्वये दिलेल्या सहमतीसह त्याचप्रमाणे प्रधान सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१११०२५१०२४३५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( वि. मा. बिवलकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,
आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती).
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे.
सर्व संचालक / सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१.
विभागीय आयुक्त (सर्व),
विभागीय कृषि सहसंचालक (सर्व).
जिल्हाधिकारी (सर्व) (बृहन्मुंबई व मुंबई उपनगर हे जिल्हे वगळून)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व))(बृहन्मुंबई व उपनगर हे जिल्हे वगळून)
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व))
कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
व्यवस्थापकीय संचालक,कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित,आरे दुग्ध कॉलनी, गोरेगांव(पूर्व), मुंबई ६५.
मुख्य लेखा व वित्त अधिकारी,जिल्हा परिषद(सर्व))(बृहन्मुंबई व उपनगर हे जिल्हे वगळून)
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, महाबीज भवन, कृषि नगर,अकोला.
सहसंचालक,लेखा व कोषागारे, संगणक कक्ष,नवीन प्रशासकीय भवन,५वा मजला, मंत्रालय, मुंबई (२ प्रतीत).
महालेखापाल (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२,मुंबई / नागपूर.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
नियोजन विभाग, (का.१४४४/१४३१) मंत्रालय, मुंबई ३२.
सामाजिक न्याय, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
वित्त विभाग, व्यय-१, अर्थसंकल्प-१३.
सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी,कृषि व पदुम विभाग (कृषि व फलोत्पादन).
निवड नस्ती.